यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांस सहायक अनुदान (अनिवार्य), लेखाशीर्ष २०७० ०५३२ याखाली सन २०२४-२०२५ करीता निधी वितरण.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन निर्णय क्रमांक : यशदा-२०२४/प्र.क्र.७४/प्रशि-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२५

**वाचा :-**

(१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थसंकल्प-३, दि. २५.०७.२०२४.

(२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. यशदा-२०२४/प्र.क्र.७४/प्रशि-४, दि.२९.०८.२०२४

(३) लेखाधिकारी, यशदा, पुणे यांचे पत्र क्र यशदा/सन २०२३-२४ चे सुधारीत अंदाजपत्रक/न.क्र. १४२(२)/२०२५; दि. २८.०२.२०२५

**प्रस्तावना :-**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेस सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र : ए-४, प्रधान लेखाशीर्ष २०७०, सहायक अनुदान (अनिवार्य) (२०७० ०५३२) याखाली ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता रु. ३९२.०४ लाख (रुपये तीन कोटी ब्याण्णव लाख चार हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. या मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी सुधारीत अंदाजानानुसार, वित्त विभागाकडून ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता रु.२७४.४३ इतका निधी (बीम्स) प्रणालीवर प्रत्यक्ष उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधीपैकी यशदा, पुणे या संस्थेस ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) यावरील खर्च भागविण्यासाठी रु.१५६.८१ लाख (अक्षरी रुपये एक कोटी छप्पन लाख ऐक्याऐंशी हजार फक्त) एवढा निधी संदर्भाधीन क्रमांक (२) नुसार वितरीत केला आहे. आता, “यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे” या संस्थेस ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) यावरील खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध निधीपैकी उर्वरीत निधी वितरीत करण्याची बाब शासन विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेस सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता सुधारीत अंदाजानुसार मागणी क्र : ए-४, प्रधान लेखाशीर्ष २०७०, सहायक अनुदाने (अनिवार्य) (२०७० ०५३२) याखाली ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता रु.२७४.४३ (रुपये दोन कोटी चौऱ्याहत्तर लाख त्रेचाळीस हजार फक्त) इतकी तरतूद मंजूर करण्यात आली आहे. सदर मंजूर तरतुदीपैकी यशदा, पुणे या संस्थेस ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) यावरील खर्च भागविण्यासाठी रु.११७.६२ लाख (रुपये एक कोटी सतरा लाख बासष्ट हजार फक्त) एवढा निधी मंजूर करण्यात येत आहे.

२.	सदर खर्च मागणी क्रमांक : ए-४ मुख्य लेखाशीर्ष “ २०७०-इतर प्रशासनिक सेवा-००३ प्रशिक्षण (००)(०६) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेस सहायक अनुदाने (अनिवार्य) (२०७० ०५३२) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून खर्च टाकण्यात यावा. सदर निधी दि.३१.०३.२०२५ पूर्वी खर्ची पडेल याची सर्वस्वी जबाबदारी यशदा,पुणे यांची राहील.

३.	सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी तसेच सहायक अनुदाने (वेतनेतर) यावरील झालेल्या खर्चाबाबतचे बाब निहाय उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे, आणि संस्थेने आर्थिक वर्ष २०२४-२५ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सीमित ठेवावा.

४.	यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-१, यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

५.	वित्त विभागाच्या दिनांक २५.०७.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र. ८ मध्ये नमूद केल्यानूसार देयक कोषागार अधिकारी यांना सादर करताना संस्थेचे मागील महिन्यातील बँक अकाउंट स्टेटमेंट (Bank Account statement) देयकासोबत जोडण्यात यावे.

६.	सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक : २५१/व्यय-४, दिनांक २०.०३.२०२५ अन्वये, दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२८१२३०१२३००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMRATA SHASHANK BHARSAKHALE

Digitally signed by NAMRATA SHASHANK BHARSAKHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=afc239a04f8765fdfaff5b427895a52f52390a276568759df519aea12578512c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E7A55E217A5A7B81D43819C528413DCC573FB455C923C289F62184B4155ED280, cn=NAMRATA SHASHANK BHARSAKHALE
Date: 2025.03.28 12:30:50 +05'30'

**( नम्रता भारसाखळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१)	मा. राज्यपाल यांचे सचिव
२)	मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३)	महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
४)	उपमहासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
५)	विभागीय आयुक्त, पुणे
६)	उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे
७)	जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८)	उप कोषागार कार्यालय, पुणे

९) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई

१०) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर

११) वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई

१२) अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

१३) निवड नस्ती, कार्यासन-प्रशि-४